**मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या आस्थापनेवर संचालक, नगर रचना व मुल्यनिर्धारण संवर्गातून प्रतिनियुक्तीने पद उपलब्ध करुन देण्यासाठी पदाची निर्मिती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२४/प्र.क्र.१२८/नवि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०६ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :**

१. नगर विकास विभाग अधिसूचना क्र. एमआरडी-३३१८/प्र.क्र.१०८/नवि-७, दि.०९/०९/२०१९
२. नगर विकास विभाग अधिसूचना क्र. टिपीएस-१२२४/०१/प्र.क्र.१८/२४/नवि-१२ दि.०९/०७/२०२४

**प्रस्तावना :-**

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाची हद्द वाढ होऊन त्यामध्ये पालघर जिल्ह्याचा संपूर्ण पालघर तालुका व वसई तालुक्याचा उर्वरित भाग व दक्षिणेकडील रायगड जिल्ह्याचा अलिबाग-पेण व खालापूर तालुक्याच्या उर्वरीत क्षेत्राचा समावेश अधिसूचना क्र. एमआरडी-३३१८/प्र.क्र.१०८/नवि-७, दि.०९/०९/२०१९ अन्वये करण्यात आलेला आहे. सदर क्षेत्राकरीता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास “विशेष नियोजन प्राधिकरण” म्हणून अधिसूचना क्र. टिपीएस-१२२४/०१/प्र.क्र.१८/२४/नवि-१२ दि.०९/०७/२०२४ अन्वये घोषित करण्यात आलेले आहे. सदर विशेष नियोजन प्राधिकरणाचा विकास आराखडा तयार करण्यासाठी शासन स्तरावरुन नगर रचना व मुल्यनिर्धारण संचालनालयातील संवर्गामधून अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीद्वारे नियुक्ती करण्यासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणावर पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांतर्गत दि.०९/०९/२०१९ च्या अधिसूचनेद्वारे समावेश झालेल्या प्रदेशाकरीता दि.०९/०७/२०२४ रोजी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास **“विशेष नियोजन प्राधिकरण”** म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. या घोषित झालेल्या विशेष नियोजन प्राधिकरणाचा विकास आराखडा तयार करण्यासाठी तसेच नगर रचना विषयक कामकाज करण्याकरीता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्या आस्थापनेवर नगर रचना व मुल्यनिर्धारण संचालनालयातील संवर्गातून प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी खालील तक्त्यात नमूद केलेली पदे या शासन निर्णयाद्वारे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदे | वेतनश्रेणी | पद संख्या |
|---|---|---|---|
| १. | संचालक | S२९-१३११००-२१६६०० | १ |
| २. | सह संचालक | S२७- ११८५००-२१४१०० | १ |
| ३. | सहाय्यक संचालक | S२३-६७७००-२०८७०० | १ |

उपरोक्त नमूद पदे ही शासन स्तरावरुन फक्त संचालक, नगर रचना व मुल्यनिर्धारण यांच्या आस्थापनेवर असलेल्या संवर्गातूनच प्रतिनियुक्तीने मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास उपलब्ध करुन देण्यात येतील. सदर मंजूर पदांच्या वेतनाचा खर्च मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०६१६५०२५१८२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUBRAO
NARAYAN SHINDE

Digitally signed by SUBRAO NARAYAN SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E5BB5862D0E131A274D92F7A1ACEF953E01301C1B0FB615DC6CCE4812BDED257, cn=SUBRAO NARAYAN SHINDE
Date: 2024.08.06 17:05:30 +05'30'

**( सुबराव शिंदे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
संचालक, नगर रचना व मुल्यनिर्धारण संचालनालय, पुणे.
उप सचिव (नवि-१२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी (नवि-२७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, नवि-७.